विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवरील व नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्या आस्थापनेवरील (विभागस्तर) येथील २० अस्थायी पदांना मुदतवाढ मंजूर करण्याबाबत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमसीओ-२०२३/प्र.क्र.३९/नवि-१४**
मंत्रालय, मुख्य इमारत, ४ था मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ०१ मार्च, २०२३.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग क्र.ईएसटी-२२०३/प्र.क्र.४३/ई-८,दि.०१.१०.२००५
व शुध्दीपत्रक समक्रमांक दि. १५.०२.२००६.
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. नपाप्र १०२००३/१०१५/प्र.क्र.३७/२००३/नवि-१६, दि.०१.१०.२००३.
३) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ २०२२/प्र.क्र.३९/नवि-१४, दि.१९.०९.२०२२.
४) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे पत्र क्र.नपप्रसं/आस्था/ आकृतिबंध/ २०२३/कक्ष-१/३९९, दि.२३.०१.२०२३.
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८.०२.२०२३.

**प्रस्तावना:-**

महसूल व वन विभागाच्या अ.क्र.१ येथील आदेशान्वये विभागीय आयुक्त कोकण, पुणे, नागपूर, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांच्या आस्थापनेवरील नगरपालिका प्रशासन कामकाज करण्यासाठी निर्माण केलेली ३६ पदे या विभागाकडे वर्ग करण्यात आलेली आहेत. विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेतील कार्यरत १७ अस्थायी पदांना व नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्या आस्थापनेवरील (विभागस्तर) येथे कार्यरत ३ अस्थायी पदांना संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०८.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता संदर्भ क्र.५ येथील वित्त विभागाच्या दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारात व सदर शासन निर्णयातील अटीच्या अधीन राहून संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी संदर्भ क्र.४ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेतील कार्यरत १७ अस्थायी पदांना व नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्या आस्थापनेवरील (विभागस्तर) येथे कार्यरत ३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार, वित्त विभागाच्या दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार तसेच, नगर विकास विभागाच्या शासन निर्णय दि.०५.०८.२०२० अन्वये मान्यता देण्यात आलेल्या नगरपरिषद प्रशासन संचालनालयाच्या सुधारीत आकृतीबंधानुसार संबंधीत पदांवर पदोन्नती/ प्रतिनियुक्ती प्रक्रीया पुर्ण होऊन संबंधित पदनिहाय पदस्थापना होईपर्यंत अथवा दि.३१.०८.२०२३ यापैकी आधी येणारा दिनांक या कालावधीसाठी विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवरील १७ अस्थायी पदांना (विवरणपत्र-१) व नगरपालिका प्रशासन संचालनालय यांच्या आस्थापनेवरील (विभागस्तर) कार्यरत ३ अस्थायी पदांना (विवरणपत्र-२) मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी उपरोक्त २० पदांचे वेतन भत्ते यावर होणारा खर्च सन २०२३-२०२४ साठी मागणी क्र. एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७-नगर विकास ८० सर्वसाधारण-००१, संचालनालय प्रशासन (००) (०१) संचालक नगरपरिषद प्रशासन (२२१७००४७) ०१ वेतन या लेखाशिर्षाखालील मंजुर तरतूदीतुन भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या प्राधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०११२३५०५१८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by C Priyanka
Date: 2023.03.01 12:38:47 +05'30'

**(प्रियांका कुलकर्णी-छापवाले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
२. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, सर्व विभाग
३. जिल्हाधिकारी, सर्व

४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

५. महालेखापाल-महाराष्ट्र ½ (लेखा परिक्षा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर

६. महालेखापाल (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर

७. वित्त विभाग, अर्थसंकल्प-३, व्यय -३, मंत्रालय, मुंबई-३२

८. कार्यासन - ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

९. मुख्याधिकारी, नगर परिषदा (सर्व)

१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

११. कार्यासन अधिकारी नवि-१५,१६,१७,१८,१९,२०,२४,२७ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१२. निवडनस्ती (नवि-१४).

(नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२३/प्र.क्र.३९/नवि-१४,दि. ०१ मार्च,२०२३ सोबतची विवरणपत्रे)

**विवरणपत्र-१**

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | एकुण पद संख्या | नगरपरिषद प्रशासनासाठी कार्यरत असलेली पदे | मुदतवाढ देण्याचे प्रस्तावित असलेली पदे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | नाशिक | ५ | निरीक्षक-१, अव्वल काकुन-४ | शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र. ईएसटी-२२०३/प्र.क्र.४३/ई-८, दि.०१.१०.२००५. |
| २ | पुणे | २ | अव्वल कारकुन -१, लिपिक-टंकलेखक-१ | वरीलप्रमाणे |
| ३ | औरंगाबाद | ५ | अव्वल कारकुन -१, लिपिक-टंकलेखक-१ | वरीलप्रमाणे |
| ४ | नागपूर | ५ | अव्वल कारकुन-४, लिपिक- टंकलेखक -१ | वरीलप्रमाणे |
| | एकुण | **१७** | | |

**विवरणपत्र-२**

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | एकुण पद संख्या | नगरपरिषद प्रशासनासाठी कार्यरत असलेली पदे | मुदतवाढ देण्याचे प्रस्तावित असलेली पदे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | पुणे | २ | निरीक्षक-१, शिपाई-१ | शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. नपाप्र-१०२००३/१०१५/प्र.क्र.३७/२/००३/नवि-१६, दि.०१.१०.२००३ |
| २ | औरंगाबाद | १ | निरीक्षक-१ | वरीलप्रमाणे |
| | एकुण | **३** | | |